जलसंपदा विभाग व कृषी विभाग यांच्या
वार्षिक समन्वय कार्यक्रमाची रुपरेषा.

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन परिपत्रक क्रमांकः सीडीए १०१४/(५०/१४)/लाक्षेवि(कामे)**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

तारीख: ११ नोव्हेंबर, २०१४.

**प्रस्तावना**

महाराष्ट्र राज्यात २०१३ अखेर ४९.७० ल.हे. (जलसंपदा विभागाचे प्रकल्प) सिंचनक्षमता निर्माण झाली आहे. या सिंचनक्षमतेचा पूर्णपणे वापर करुन पिकांच्या उत्पन्न वाढीसाठी प्रयत्न करण्याची गरज निर्माण झाली आहे. १९७४ ते १९९२ पर्यंत लाभक्षेत्र विकास प्राधिकरणामार्फत असे प्रयत्न करण्यात आले होते व ही यंत्रणा सन २००० पर्यंत चालू होती. त्या व्यवस्थेला पुनर्जिवित करणे व अधिक व्यापक बनविण्याची शिफारस सिंचन विषयक विशेष चौकशी समितीने सुद्धा केली आहे.

राज्यातील कृषी विभागामार्फतही विविध पिकांचे उत्पादनात वाढ करुन एकंदरीत शेतकऱ्यांच्या उत्पन्नातही वाढ होण्यासाठी प्रयत्न केले जातात. तथापि, पाण्याअभावी अशा प्रयत्नांना मर्यादा येतात. त्यामुळे जलसंपदा विभागातील प्रकल्पांच्या लाभक्षेत्रात अशा प्रयत्नांना विशेष वाव आहे.

जलसंपदा विभाग व कृषी विभाग स्वतंत्रपणे काम करत असल्याने त्यांच्या उद्दिष्टपूर्तीसाठी मर्यादा येत आहेत. यासाठी प्रकल्पांच्या लाभक्षेत्रात दोनही विभागाच्या समन्वयाची गरज निर्माण झाली आहे. या अनुषंगाने याबाबीचा सखोल विचार करण्यासाठी दिनांक १० ऑक्टोबर, २०१४ रोजी मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांच्या मार्गदर्शनान्वये जलसंपदा विभाग व कृषी विभागातील वरिष्ठ अधिकाऱ्यांची कार्यशाळा घेण्यात आली होती. या कार्यशाळेने शिफारस केल्याप्रमाणे जलसंपदा विभाग व कृषी विभागातील समन्वयासाठी शासन खालील निर्णय घेत आहे.

## शासन परिपत्रक

जलसंपदा विभाग व कृषी विभागातील विविध पातळीवर समन्वय राखण्यात यावा. याची सर्वसाधारणपणे खालील उद्दिष्टे राहतील

१) राज्यात निर्माण झालेली सिंचन क्षमता व प्रत्यक्ष भिजणारे क्षेत्र यातील तफावत दूर करणे.

२) बागायती शेती कशी करावी, कुठली पिके घ्यावीत, बी-बियाणे, खते, किटकनाशके कशी निवडावी व कोणत्या प्रमाणात वापरावी याची माहिती पुरविणे.

३) कृषी विद्यापिठातून होणारे संशोधन, इतर प्रकल्पांच्या लाभक्षेत्रात आलेल्या अडचणी व त्या सोडविण्याचे उपाय लाभधारक शेतकऱ्यांपर्यंत पोहचविणे.

४) शेतमालासाठी बाजारपेठा, शेतमालाची साठवण व्यवस्था व प्रक्रिया यासाठी प्रयत्न करणे.

५) लाभक्षेत्रासाठी योग्य पिक पद्धती ठरविणे व त्याचा वार्षिक कार्यक्रमात समावेश करणे.

६) सिंचन वितरण व्यवस्थेचे आवश्यकतेनुसार आधुनिकीकरण व नलिका वितरण पद्धती, सूक्ष्म सिंचन पद्धती यांचा अंतर्भाव करणे.

७) सिंचन प्रकल्पाची आखणी करताना (पीकरचना ठरवताना) स्थानिक हवामान, जमीन, खोऱ्यातील पाण्याच्या उपलब्धतेचे प्रमाण, प्रति घन मीटर पाण्याचे उत्पादकता मुल्य विचारात घेऊन संकल्पित लाभक्षेत्रात आर्थिकदृष्ट्या अधिकाधिक अनुकूलता असणाऱ्या सिंचनाखालील पिकांचा, पिकरचनेत समावेश करणे.

८) प्रत्येक प्रकल्पाच्या लाभक्षेत्रात खरीप, रब्बी, उन्हाळी हंगामात उपलब्ध पाणी, पाणी पाळ्यांची संख्या, हवामान, जमीन, पाऊस, भूजल, बाजारपेठ यांचा सखोल विचार करुन त्या त्या हंगामात घ्यावयाच्या पिकाचे नियोजन करणे. त्या पिकाचे नियोजन करणे. त्या पिकासाठी पाणी, बियाणे, किटकनाशके, खते, बाजारपेठ उपलब्ध होणेसाठी संयुक्तपणे प्रयत्न करणे.

९) लाभक्षेत्रातील पिकाच्या उत्पादकतेमध्ये अशी वाढ होऊ शकते हे दाखविण्यासाठी प्रायोगिक पिक प्रात्यक्षिकाचे प्रयोग संयुक्तपणे राबविणे.

१०) प्रकल्पाच्या लाभक्षेत्रात महाराष्ट्र सिंचन पद्धतीचे शेतकऱ्यांकडून व्यवस्थापन कायदा २००५ नुसार पाणी वापर संस्था स्थापन झाल्या आहेत. या पाणी वापर संस्थांना केंद्रबिंदू मानून कृषी विभागाच्या योजनांची आखणी करणे, अंमलबजावणी करणे, अस्तित्वातील योजनांची पुर्नआखणी करणे या व अशा अनेक माध्यमातून पाणी वापर संस्थांना सक्षम करणे.

११) म.सि.प.शे.व्य.कायदा २००५ मधील कलम २० व म.सि.प.शे.व्य.कायदा २००६ मधील नियम ११ अन्वये लाभक्षेत्रात कृषी, जल व्यवस्थापन, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय, बाजारपेठ विषयक उप समित्या नेमण्याची तरतूद आहे. कृषी विभागामार्फतही गाव पातळीवर कृषी विज्ञान मंडळ कार्यरत आहे. ही मंडळे पाणी वापर संस्थेशी संलग्न करावे.

१२) लाभक्षेत्रातील पीकक्षेत्र मोजणीमध्ये आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करणे, कृषी विभाग, जलसंपदा विभाग, महसूल विभाग यांचा समन्वये करणे.

१३) गावपातळीवर काम करणारे जलसंपदा, कृषी, भूजल विभागाचे कर्मचारी, लाभधारक शेतकरी यांचेसाठी संयुक्तपणे प्रशिक्षण घेणे, कार्यशाळा आयोजित करणे इत्यादी.

वरील उद्दिष्टे साध्य करण्यासाठी राज्यस्तरावर, विभागीय स्तरावर, जिल्हास्तरावर व क्षेत्रीयस्तरावर समन्वय समित्या गठीत करण्यात येत आहेत. त्यांनी वरील उद्दिष्टे साध्य करण्यासाठी काम करावे.

अ) जलसंपदा विभाग व कृषी विभाग यांची राज्यस्तरीय समन्वय समिती.

| | | |
|---|---|---|
| १. अपर मुख्य सचिव कृषी विभाग | ... | अध्यक्ष |
| २. प्रधान सचिव, (लाक्षेवि) | ... | सह अध्यक्ष |
| ३. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | ... | सदस्य |
| ४. कृषी आयुक्त, पुणे | ... | सदस्य |
| ५. संचालक, भूजल सर्वेक्षण विभाग, पुणे | ... | सदस्य |
| ६. मुख्य अभियंता (पा) व सह सचिव | ... | सदस्य-सचिव |

या समितीची वर्षातून किमान दोनवेळा रब्बी व उन्हाळी हंगाम सुरु होण्यापूर्वी बैठक घेऊन जलसंपदा विभागास इतर विभागांचा समन्वय साधून त्याविषयीचे शासनाचे धोरण, आढावा, नियंत्रण याविषयी कामकाज अपेक्षित आहे.

**ब) जलसंपदा विभाग व कृषी विभाग यांची विभागीय समन्वय समिती.**

शासन परिपत्रक : सीडीए १०१४/(५०/१४)/लाक्षेवि (कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई दिनांक २६ मार्च, २०१४ अन्वये गठीत समिती हीच विभागीय समन्वय समिती म्हणून कार्य करील.

या समितीची हंगाम सुरु होण्यापूर्वी बैठक अपेक्षित आहे. या बैठकीत वरील उद्दिष्टपूर्तीसाठी ठोस कार्यक्रम ठरविण्यात यावा. विशेषत: उपलब्ध पाण्याचा विचार करुन त्यांचा फलदायी, इष्टतम वापराचे नियोजन करावे. उद्दिष्ट पूर्ततेच्या अनुषंगाने मागील हंगामाचा आढावा घ्यावा. राज्यस्तरीय समितीने घेतलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करण्यासाठी व उद्दिष्टपूर्तीसाठी, संनियंत्रणासाठी कार्यपद्धती ठरवावी.

**क) जलसंपदा व कृषी विभाग यांची जिल्हास्तरीय समन्वय समिती**..

| | | | |
|---|---|---|---|
| १. | अधीक्षक अभियंता (सिंचन व्यवस्थापनाशी संबंधीत) | ... | अध्यक्ष |
| २. | जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी | | सदस्य |
| ३. | प्रकल्प संचालक, आत्मा (जिल्हास्तरीय) | ... | सदस्य |
| ४. | वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण विभाग | ... | सदस्य |
| ५. | कार्यकारी अभियंता, जलसंधारण विभाग | ... | सदस्य |
| ६. | कार्यकारी अभियंता, जि.प. | .. | सदस्य |
| ७. | मोठ्या प्रकल्पावरील प्रकल्पस्तरीय पा.व.स.चे प्रतिनिधी | ... | सदस्य |
| ८. | अधीक्षक अभियंता व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी यांनी निर्देशित केल्यानुसार स्वयंसेवी संस्था, केंद्रसरकारी त्रणेचे अधिकारी, उल्लेखनीय काम केलेले अधिकारी, प्रगतीशिल शेतकरी, लोकप्रतिनिधी | .. | निमंत्रित सदस्य |
| ९. | कार्यकारी अभियंता (व्यवस्थापनाशी संबंधित) | ... | सदस्य-सचिव |

राज्यस्तरीय समिती व विभागीय समितीचे निर्देश वर उल्लेख करण्यात आलेले उद्दिष्ट साध्य करण्यासाठी प्रत्यक्ष कार्यक्रम, वेळापत्रक, अंमलबजावणी करावी व आढावा घ्यावा. सर्वसाधारणपणे प्रत्येक हंगामापूर्वी एक बैठक व जिल्ह्यातील या विषयांशी संबंधित तज्ञ, शेतकरी, स्वयंसेवी संस्था, लोकप्रतिनिधी यांचेसाठी किमान वर्षातून एक कार्यशाळा आयोजित करावी.

**ड) जलसंपदा व कृषी विभाग यांची क्षेत्रीय समन्वय समिती.**

(तालूका व महसूल मंडळ स्तरावर)

| | | | |
|---|---|---|---|
| १. | व्यवस्थापनाशी संबंधित कार्यकारी अभियंता | ... | अध्यक्ष |
| २. | उप विभागीय कृषी अधिकारी | ... | सदस्य |
| ३. | तालुका कृषी अधिकारी | ... | सदस्य |
| ४. | कनिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण यंत्रणा | | सदस्य |
| ५. | मोठ्या/मध्यम प्रकल्पावरील प्रकल्पस्तरीय पा.व.स.चे अध्यक्ष किंवा आवश्यकतेनुसार निम्नस्तरीय पाणी वापर संस्थेचे अध्यक्ष | .. | सदस्य |
| ६. | कार्यकारी अभियंता व कृषी अधिकारी यांच्या संमतीने स्वयंसेवी संस्था, प्रगतीशिल शेतकरी, उल्लेखनीय काम केलेले अधिकारी, प्रशिक्षण संस्थांचे प्राध्यापक व तत्सम | .. | निमंत्रित सदस्य |
| ७. | उप विभागीय अभियंता | ... | सदस्य-सचिव |

या समितीने वरिष्ठ समित्यांनी घेतलेल्या निर्णयाची प्रत्यक्ष अंमलबजावणी करावी. त्यासाठी दोन्ही विभागातील अधिकारी व कर्मचारी यांच्यासाठी प्रशिक्षण घेणे, सर्व लाभधारक, पाणी वापर संस्थेचे सदस्य, स्वयंसेवी संस्था, मार्केट कमिटी, उद्योजक यांचेसाठी व्यापक प्रशिक्षणे घ्यावी. काही प्रशिक्षणासाठी वाल्मी, आत्मा यांचे सहकार्य घ्यावे.

या समितीने जलसंपदा विभागातील शाखा अधिकारी, कालवा निरीक्षक, मोजणीदार कृषी विभगातील मंडळ कृषी अधिकारी, कृषी पर्यवेक्षक व कृषी सहायक यांच्या समन्वयासाठी तालुकास्तरावर व गावपातळीवर वर्षातून किमान दोन कार्यशाळा आयोजित कराव्यात.

या समितीने वर्षातून किमान प्रत्येक हंगामापूर्वी समन्वय बैठक घ्यावी व प्रत्येक तालुक्यात किमान एक कार्यशाळा घ्यावी.

**सर्वसाधारण :-**

१) प्रत्येक समितीने केलेल्या कामाचा वार्षिक अहवाल वरिष्ठ समितीस संक्षिप्त स्वरुपात सादर करावा. अहवालात प्रामुख्याने ठरविण्यात आलेली उद्दिष्टे व त्याची पूर्तता अशा स्वरुपातच असावी.

२) समन्वये समितीच्या बैठकीस अशासकीय निमंत्रित सदस्य उपस्थित राहिल्यास त्यांना त्या स्तरावरील इतर सदस्यांना देय असणारा वाहतूक भत्ता व दैनिक भत्ता देय राहिल.

३) जलसंपदा विभाग व कृषी विभाग यांच्या समन्वय समितीच्या बैठकीचा खर्च जलसंपदा विभागाच्या कार्यालयीन खर्चाच्या उपलब्ध अनुदानातून करण्यात यावा.

४) कार्यशाळेचा खर्च जलसंपदा विभागाच्या प्रकल्पांशी संबंधित देखभाल व दुरुस्ती अनुदानातून करण्यात यावा.

५) लाभधारकांच्या प्रशिक्षणाचा खर्च कृषी विभागाने यासाठी असलेल्या अनुदानातून करावा.

६) या परिपत्रकाची तात्काळ अंमलबजावणी सुरु करावी.

सदर शासन परिपत्रक अपर मुख्य सचिव (कृषि व पणन) यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११११६१९०४०२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramesh Babubhai Galiyal

Digitally signed by Ramesh Babubhai Galiyal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ramesh Babubhai Galiyal
Date: 2014.11.11 16:40:58 +05'30'

**(र. बा. गलियाल)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव, (कृषि व पणन) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव, सहकार व पणन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
७) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा, पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
८) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
९) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव
१०) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
११) कृषी आयुक्त, पुणे.
१२) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
१३) संचालक, भूजल सर्वेक्षण विभाग, पुणे.
१४) सर्व विभागीय आयुक्त
१५) सर्व जिल्हा अधिकारी
१६) सर्व कृषी संचालक
१७) सर्व सहसंचालक, भूजल सर्वेक्षण विभाग
१८) सर्व सहसंचालक, कृषी
१९) सर्व सहसंचालक, सहकार
२०) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
२१) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद)
२२) सर्व जिल्हा अधीक्षक, कृषि अधिकारी

२३) सर्व प्रकल्प संचालक, आत्मा.
२४) सर्व उपसंचालक, भूजल सर्वेक्षण विभाग
२५) सर्व वरिष्ठ भूवैज्ञानिक
२६) सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग
२७) सर्व कार्यकारी अभियंता, जलसंधारण विभाग
२८) निवडनस्ती/लाक्षेवि (कामे)